पोलीस विभागातील कर्मचाऱ्यांना मंजूर करण्यात येणाऱ्या अतिकालीक भत्त्यांच्या (आहार भत्त्यांच्या) दरात वाढ करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,
शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीएए ०३०४/सीआर-१२/पोल-५अ,
मंत्रालय, मुंबई ४०००३२, दिनांक २० जुलै, २००४.

**वाचा :** १) शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीएए १८८०/२६/पोल-५अ,दि.२५.५.१९८१
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीएए ०३९१/सीआर-२७२/पोल-५अ,दि.२.९.१९९२
३) शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीएए ०३९५/सीआर-२५५/पोल-५अ,दि. २ नोव्हेंबर,१९९९.
४) पोलीस महासंचालकांचे क्र. पोमसं/३०/५२५२/२००४, दि.७.१.२००४ चे पत्र.
५) शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीएए ०३०४/सीआर-१२/पोल-५अ,दि. २१ फेब्रुवारी,२००४.
६) शासन पत्र क्र.बीजीटी १००४/२०५५/२००४-२००५/बीयुडी-१, दि. ८.७.२००४

**शासन निर्णय :-** राज्यातील पोलीस शिपाई ते पोलीस उपनिरीक्षक पदापर्यंतच्या अधिकारी / कर्मचारी यांना २४ तासांच्या कालावधीत सतत १० तास बंदोबस्त डयुटी किंवा इतर कामासाठी कर्तव्यार्थ राहिल्यास विशेष अतिकालिक भत्ता (आहारभत्ता) मंजूर करण्यात येतो. शासन निर्णय, समक्रमांक, दि.२१ फेब्रुवारी,२००४ अन्वये आहारभत्त्याच्या दरात वाढ करण्यात आलेली आहे. तथापि सदर शासन निर्णयानुसार वाढीव दराने द्यावयाचा अतिकालीक भत्ता (आहारभत्ता) एका आर्थिक वर्षात जास्तीत जास्त २०० कामकाजाच्या दिवसांसाठी अनुज्ञेय होता. आता शासनाने ही २०० दिवसांची मर्यादा काढून टाकण्याचा निर्णय घेतलेला असून हा अतिकालीक भत्ता २४ तासांच्या कालावधीत सतत १० तास बंदोबस्त किंवा इतर कामासाठी कर्तव्यार्थ राहिल्यास त्या आर्थिक वर्षातील सर्व दिवसांसाठी देय राहील.

२. सदरचा अतिकालिक भत्ता ज्या अधिकारी/कर्मचारी यांनी १० तासांपेक्षा जास्त कालावधीसाठी कर्तव्य बजाविलेले आहे त्यांनाच देण्यात यावा. त्यासाठी संबंधित पोलीस ठाण्यात/घटक कार्यालयात नोंदवही ठेवण्यात यावी व त्यामध्ये वेळेबरोबरच ज्या कामासाठी अधिकारी/कर्मचारी थांबले होते त्याची नोंद घेण्यात यावी. ही नोंदवही आवश्यक तेंव्हा तपासणीसाठी उपलब्ध करून देण्यात यावी. हा अतिकालिक भत्ता सरसकट दिला जाणार नाही याची जबाबदारी यथास्थित संबंधित पोलीस ठाणे प्रमुख/कार्यालय प्रमुख इत्यादींची राहील.

३. यासाठी होणारा खर्च लेखाशिर्ष- २०५५-पोलीस,
००१ संचालन व प्रशासन (००)(०१) पोलीस निरीक्षणालय,
००३ शिक्षण व प्रशिक्षण(००)(०१)पोलीस प्रशिक्षण विद्यालये-इतर खर्च,
१०१ गुन्हा अन्वेषण व दक्षता (००)(०१) गुन्हा अन्वेषण विभाग, बृहन्मुंबई,
१०१- गुन्हा अन्वेषण व दक्षता (००)(०२) - गुन्हा अन्वेषण विभाग मुफसल-इतर खर्च,
१०१- गुन्हा अन्वेषण व दक्षता (००)(०३) - लाचलुचपत विरोधी केंद्र,
१०५ सीमा सुरक्षा दल (००)(०१) सीमा सुरक्षा दल-इतर खर्च,
१०९ जिल्हा पोलीस (००)(०१) जिल्हा पोलीस दल-इतर खर्च,
१११ रेल्वे पोलीस(००)(०१) मध्य, दक्षिण व पश्चिम रेल्वे पोलीस-इतर खर्च,

१११ रेल्वे पोलीस(००)(०२) मध्य, दक्षिण, पूर्व व पश्चिम रेल्वे पोलीस-इतर खर्च,
१०८ राज्य मुख्यालय पोलीस (०१) पोलीस आयुक्तांचे कार्यालय, बृहन्मुंबई
(०१)(०१) आस्थापना,
(०२) शहर पोलीस (०२)(०१) आस्थापना,
(०३)(०२) सार्वजनिक जमिनिवरील वाहनांना लायसन देणे,
(०४) सरकारी इमारतींसाठी रक्षक (०४)(०१)आस्थापना

या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २००४-२००५ या आर्थिक वर्षात अतिरिक्त अर्थसंकल्पासह मंजुर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या औपचारिक संदर्भ क्र. सीआर २९३/२००४/व्यय ७, दि.१५.५.२००४ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शि. शं. धुमाळे )
सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक , महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महासंचालक , ओ.सी.जी., मुंबई,
अपर पोलीस महासंचालक, गुन्हा अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे,
अपर पोलीस महासंचालक (प्रशिक्षण व खास पथके), मुंबई,
आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक,
सर्व परिक्षेत्रिय विशेष पोलीस महानिरीक्षक,
सर्व पोलीस आयुक्त/ सर्व पोलीस अधिक्षक,
सर्व प्राचार्य, प्रादेशिक पोलीस प्रशिक्षण शाळा,
सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.१ ते१०,
प्राचार्य, गुन्हा अन्वेषण प्रशिक्षण शाळा, नाशिक,
महालेखापाल (लेखापरिक्षा) -१/२,महाराष्ट्र , मुंबई/नागपूर,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग, व्यय-७, मंत्रालय, मुंबई- ३२.
उ.स.बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
निवड नस्ती पोल-५अ,